५% पेसा अबंध निधीचे वितरण करण्यासाठी ग्रामविकास विभागातील कार्यासन अधिकारी, रोख शाखा यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** पेसाअ २०१९/प्र.क्र. ७४/पं.रा.-२

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,

मुंबई - ४०० ००१.

तारीख: १९ मार्च, २०२०.

**वाचा :-** १. आदिवासी विकास विभागाकडील शासन निर्णय आ.वि.वि. क्रमांक पेसा-२०१५/प्र.क्र.१९/का-१७, दिनांक २१.४.२०१५.

२. आदिवासी विकास विभागाकडील शासन निर्णय क्रमांक बीयुडी-२०१९/प्र.क्र.०८/का-०६, दिनांक १.१०.२०१९.

**प्रस्तावना :-**

जनजाति सल्लागार परिषदेच्या ५० व्या बैठकीत झालेल्या निर्णय आ.वि.वि. क्रमांक पेसा-२०१९/प्र.क्र.८८/का-१७, दिनांक १९.६.२०१९ अन्वये सदरील योजना ग्राम विकास विभागाकडे वर्ग करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. वि.वि.क्र. अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ८.७.२०१९ रोजीच्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीत तरतुदींच्या ६०% च्या मर्यादेत सदर योजनेचा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर ग्राम विकास विभागास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील (पेसा) ग्रामपंचायतींना ५% थेट निधी योजना (लेखाशिर्ष २५०१ २९७१) अंतर्गत सन २०१९-२० करीता अर्थसकल्पीत निधीच्या ६०% प्रमाणात रुपये १६०७३.१५४ लाख इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख

म्हणून प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग तथा नियंत्रक अधिकारी यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन निर्णय क्रमांक बीयुडी-२०१९/प्र.क्र.०८/का-०६, दिनांक १.१०.२०१९ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

## शासन निर्णय :-

राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील (पेसा) ग्रामपंचायतींना ५% थेट निधी योजना (लेखाशिर्ष २५०१ २९७१) अंतर्गत सन २०१९-२० करीता अर्थसकल्पीत निधीच्या ६०% प्रमाणात रुपये १६०७३.१५४ लाख इतके अनुदान मंजुर करण्यात आले आहे.

५% पेसा अबंध निधीबाबत ग्रामविकास विभागातील कक्ष अधिकारी, रोख शाखा यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१८११३७१६३५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Eknath Kashinath Gagare

Digitally signed by Eknath Kashinath Gagare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=d9a3ccbc053d2cf9b4c30c85bb8db0e6c39331b90d48b0aba6cde387b5ec208c, serialNumber=6bc79f4a08ca2d5d74e02e7214f6aad4ef7d9afdeba5bfcdef24d45049099939, cn=Eknath Kashinath Gagare
Date: 2020.03.19 14:04:15 +05'30'

**(ए.का.गागरे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य मुंबई/ नागपूर.
२. महालेखापाल २ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य मुंबई/ नागपूर.
३. कक्ष अधिकारी (रोख शाखा), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. वित्त विभाग (व्यय ५), मंत्रालय, मुंबई.
५. कक्ष अधिकारी (कार्या-१७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.